**छत्रपती शाहू महाराज संशोधन, प्रशिक्षण व मानव विकास संस्था (सारथी), पुणे या संस्थेच्या अधिनस्त खारघर, नवी मुंबई विभागीय कार्यालय येथील कार्यालयीन इमारत, वसतिगृह इत्यादी इमारती बांधकामास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन निर्णय क्र: सारथी २०२३/प्र.क्र.३७/का.१४२५-अ**
**हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा रोड,**
**मंत्रालय, मुंबई -३२**
**दिनांक - २० जून, २०२३**

**वाचा:**

१. शासन निर्णय, नगर विकास विभाग, यांचे पत्र क्र.सीआयडी/ ३३२२ / अनौसं.८ / प्र.क्र.४५ / नवि-१०, दि.१३.०६.२०२२
२. शासन निर्णय, वित्त विभाग क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम (भाग -२) दि.२०.०९.२०१९
३. व्यवस्थापकीय संचालक, छत्रपती शाहू महाराज संशोधन प्रशिक्षण व मानव विकास संस्था (सारथी), पुणे यांचे पत्र क्रं.सारथी/स्थावर विभाग/फा.क्र १३/३११२/२०२२-२३ दि.०२/०२/२०२३ चे पत्र व सहपत्र
४. नियोजन विभाग पत्र क्र. सारथी २०२२/प्र.क्र.१२२/१४२५, दिनांक - १६.०६.२०२२

**प्रस्तावना:-**

छत्रपती शाहू महाराज संशोधन, प्रशिक्षण व मानव विकास संस्था (सारथी), पुणे या संस्थेच्या अधिनस्त विभागीय कार्यालयासाठी मराठा, कुणबी, मराठा- कुणबी, कुणबी-मराठा या लक्षित गटातील लाभार्थ्यांना अभ्यासिका, (मुला-मुलींना) वेगवेगळे वसतीगृह व इतर अनुषंगिक प्रयोजनासाठी नगर विकास विभागाचा शासन निर्णय क्र.सीआयडी-३३२२/अनौ.सं.-८/प्र.क्र.४५/न.वि.१०, दि.१३.०६.२०२२ अन्वये छत्रपती शाहू महाराज संशोधन, प्रशिक्षण व मानव विकास संस्था (सारथी), पुणे या राज्य शासनाच्या अंगिकृत संस्थेच्या विविध उपक्रमांसाठी नवी मुंबई येथील खारघर नोड मधील सेक्टर क्रं.३७, क्षेत्र ३५०० चौ.मी. चा भूखंड "एक विशेष बाब" म्हणून १ रूपया प्रती चौ.मी या नाममात्र दराने भाडेपट्टयाने शासनाच्या नियोजन विभागास वाटप करण्यात मान्यता दिली आहे. त्या अनुषंगाने विभागाकडून सदर जमिनीचा पुढील बांधकामाच्या कार्यवाहीसाठी व्यवस्थापकीय संचालक, छत्रपती शाहू महाराज संशोधन, प्रशिक्षण व मानव विकास संस्था (सारथी ), पुणे यांना दि.१६.०६.२०२२ च्या पत्रान्वये प्राधिकृत करण्यात आले आहे. आता छत्रपती शाहू महाराज संशोधन, प्रशिक्षण व मानव विकास संस्था (सारथी), पुणे या संस्थेकडून सदर जागेत इमारतीचे कार्यालय, अभ्यासिका, मुलांचे व मुलींचे वसतिगृह इत्यादी बांधकामाचे अंदाजपत्रक व नकाशे प्राप्त झाले असून प्रस्तावित इमारतीच्या

बांधकामासाठी रु.१६२८१.५२ लक्ष (अक्षरी रुपये एकशे बासष्ट कोटी ऐक्याऐंशी लक्ष बावन्न हजार फक्त) एवढ्या किमतीचे ढोबळ अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याबातचा प्रस्ताव नियोजन विभागास सादर केला आहे. त्यानुषंगाने सदर प्रकरणी इमारतींच्या बांधकामास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** :-

छत्रपती शाहू महाराज संशोधन प्रशिक्षण व मानव विकास संस्था (सारथी), पुणे यांच्या अधिनस्त खारघर, नवी मुंबई येथे विभागीय कार्यालयाची इमारत, मुला-मुलींच्या वसतिगृह, इतर इमारतीचे बांधकाम व इतर अनुषंगिक बाबींसाठी रु.१,१९,३८,२६,३५०/- (अक्षरी एकशे एकोणवीस कोटी अडोतीस लक्ष सव्वीस हजार तीनशे पन्नास रुपये ) इतक्या अंदाजपत्रकास व आराखड्यास मान्यता देण्यात येत आहे. सदर मान्यता ही उच्चाधिकार समीतीने खाली नमुद केलेल्या अटींच्या अधीन राहुन देण्यात येत आहे.

१. काम सुरु करण्यापूर्वी नमुना नकाशा, मांडणी नकाशा तसेच विस्तृत नकाशास वास्तुविशारदांकडून मंजुरी घेऊनच सुरु करावे.
२. ढोबळ स्वरुपात धरण्यात आलेल्या तरतूदीबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रक करूनच काम हाती घ्यावे.
३. प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्रं.इएनव्ही -२०१३/प्र.क्र.१७७/तां.क.१, दि.१०.०१. २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वांनुसार कार्यवाही करण्यात यावी.
४. सदर कामाच्या बांधकामाचा खर्च नियोजन विभागाने त्यांच्याकडे उपलब्ध असलेल्या नियत व्ययामधून करण्यात यावा.
५. सार्वजनिक बांधकाम विभाग शासन निर्णय क्र.बीडीजी २०१७/प्र.क्र.६०/इमा-२, दि.०७.०७.२०१७ अन्वये कार्यवाही करण्यात यावी.
६. नियोजित जागा उपभोक्ता विभागाच्या ताब्यात असल्याचे प्रमाणपत्र प्राप्त करुनच सदर कामाच्या निविदा सूचना प्रसिध्द करण्यात याव्यात.
७. प्रस्तावातील खरेदी संबंधी बाबींकरीता ई-निविदा प्रणालीचा अवलंब करुन उद्योग ऊर्जा व कामगार विभागाकडे दि.२४.०८.२०१७ च्या शासन निर्णयान्वये सूचना विचारात घ्याव्या.
८. प्रस्तुत काम पुरातत्व विभागाच्या अक्त्यारित येत असल्यास संबंधित विभागाची तसेच महानगरपालिका तत्सम प्राधिकरणे यांची परवानगी घेणे आवश्यक आहे.
९. प्रस्तुत काम अर्थसंकल्पाव्यतिरिक्त करावयाचे झाल्यास ५% सेंटेन चार्चेस मिळावयाचे आहे.
१०. विषयांकित कामाकरिता सुधारित प्रशासकीय कामाची आवश्यकता लागणार नाही या दृष्टीने विशेष दक्षता घेवून काम करण्यात यावे.
११. काम करण्यापूर्वी मालकी हक्काबाबतची पूर्तता करुन घ्यावी. तसेच जागेची उपलब्धता, योग्यता व जागा पुरेशी आहे किंवा नाही याबाबतची खातरजमा व्यवस्थापकीय संचालक, (सारथी) पुणे यांनी करावी.

सदरचा आदेश मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली उच्चाधिकार समितीने दिनांक २१.०४.२०२३ च्या बैठकीत दिलेल्या मान्यतेनुसार तसेच सार्वजनिक बांधकाम विभागाकडून अनौपचारिक संदर्भ ४९/२०२३/इमा-२, दिनांक ०६.०३.२०२३ नुसार दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेताक क्र. २०२३०६२०१५३१५११४१६ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VILAS DNYANOBA LAD

Digitally signed by VILAS DNYANOBA LAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PLANNING DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=032607e9d41d4118da0f5f56ec3bafc0cd36444e78848691ec5c4609ff36c6b0, pseudonym=1BBB431FA97E720E6C6B985E9DC9D26CFE5E880D, serialNumber=A2939F426B7A0C7B7ADCBDB9EF405DFECD0B88D1E94A1818DAF4B9F1D6ACEC4B, cn=VILAS DNYANOBA LAD
Date: 2023.06.20 15:34:41 +05'30'

**( विलास लाड )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा.मंत्री, उच्च व तंत्र शिक्षण, मंत्रालय, मुंबई याचे खाजगी सचिव
४. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
५. प्रधान सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
६. अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१,महाराष्ट्र, मुंबई/नागपूर
८. व्यवस्थापकीय संचालक, छत्रपती शाहू महाराज संशोधन, प्रशिक्षण व मानव विकास संस्था (सारथी), पुणे
९. मुख्य अभियंता सा.बा.प्रादेशिक विभाग, मुंबई
१०.अधिक्षक अभियंता, सा.बा.मंडळ, कोकण भवन, रायगड
११.कार्यकारी अभियंता, सा.बा.विभाग, पनवेल, रायगड
१२.उपसंचालक, लेखा व कोषागारे संचालनालय, पुणे/नवी मुंबई
१३.उप अभियंता, सा.बा.विभाग क्र.१, पनवेल
१४.अधिदान व लेखा अधिकारी मुंबई
१५.निवासी लेखा परिक्षा मुंबई
१६.कक्ष अधिकारी (का.क्रं.इमारती-२) सार्वजनिक बांधकाम विभाग मंत्रालय मुंबई-१
१७.निवडनस्ती.